सन २०१८-१९ या वर्षाकरीता "००२९-जमीन महसूल" व "०८५३-गौणखनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या रकमा" यांचे एकत्रित उद्दिष्ट निश्चित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरईव्ही-०४१८/प्र.क्र.३१/टी-२**

१ ला मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख: १३ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

१. शासन ज्ञापन, महसूल व वन विभाग, क्र.बीयुडी-२०१८/००२९/प्र.क्र.१५५ /ब-१,दि.२०.४.२०१८
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. गौखनि १०/०५१८/प्र.क्र.२०३/ख,दि.२६.७.२०१८

प्रस्तावना :-

राज्य शासनास दरवर्षी विविध बाबींद्वारे महसूल प्राप्त होत असतो. त्यासाठी वित्त विभागाकडून सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना महसूल वसुलीचे उद्दिष्ट निश्चित करुन दिले जाते. त्यानुसार दरवर्षी महसूल विभागास देण्यात आलेल्या उद्दिष्टानुसार या विभागाकडून मुख्यत्वे जमीन महसूल आणि गौणखनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या जमा रकमा या बाबींद्वारे महसूल वसूल केला जातो. या विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयांकडून वसूल करण्यात आलेला महसूल "००२९-जमीन महसूल" आणि "०८५३-गौण खनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या रकमा" या मुख्यलेखाशीर्षाखाली जमा केला जातो. वित्त विभागाकडून देण्यात आलेले महसूल वसुलीचे उद्दिष्ट, मागील वर्षी देण्यात आलेल्या उद्दिष्टानुसार वसूल करण्यात आलेला महसूल आणि महसूल वाढीसाठी या विभागाकडून करण्यात येणाऱ्या उपाययोजना विचारात घेऊन सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उक्त लेखाशीर्षाखाली सर्व विभागीय आयुक्त व जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांच्यासाठी महसूल वसुलीचे एकत्रित उद्दिष्ट निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०१८-१९ या वर्षाकरीता "००२९-जमीन महसूल" आणि "०८५३-गौण खनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या रकमा" या लेखाशीर्षांसाठी महसूल वसुलीचे एकूण ₹ ५५९६५१.६३ लाख इतके एकत्रित उद्दिष्ट राज्यस्तरावर निश्चित करण्यात येत आहे. सर्व विभागीय आयुक्त व जमाबंदी

आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांच्यासाठी सदर उद्दिष्टाची विगतवारी खालीलप्रमाणे राहील :-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | विभाग | ००२९-जमीन महसूल | ०८५३- गौणखनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या रकमा | सन २०१८-१९ या वर्षाकरीता महसूल वसुलीचे एकत्रित उद्दिष्ट |
|---|---|---|---|---|
| १ | कोकण | २००८६९.४२ | ५१६००.०० | **२५२४६९.४२** |
| २ | नाशिक | २०३१६.८९ | ३१५००.०० | **५१८१६.८९** |
| ३ | पुणे | ३८८३६.२३ | ४६१००.०० | **८४९३६.२३** |
| ४ | अमरावती | १०३१४.५३ | २७४००.०० | **३७७१४.५३** |
| ५ | नागपूर | १९६३७.७२ | ४१७००.०० | **६१३३७.७२** |
| ६ | औरंगाबाद | १२३३३.३२ | ४१७००.०० | **५४०३३.३२** |
| ७ | जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख पुणे | १७३४३.५२ | -- | **१७३४३.५२** |
| | **एकूण** | **३१९६५१.६३** | **२४००००.००** | **५५९६५१.६३** |

०२. वरीलप्रमाणे दिलेल्या उद्दिष्टांचे जिल्हानिहाय वाटप त्या त्या जिल्ह्याची वसुलीची क्षमता विचारात घेऊन विभागीय आयुक्त यांनी करावे व त्यानुसार महसूल वसुलीचा नियमित आढावा घेण्यात यावा.

०३. शासनाने वरीलप्रमाणे निश्चित केलेल्या महसूल वसुलीचे उद्दिष्ट विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन न चुकता साध्य करण्यात यावे. त्यासाठी खालील सूचनांचे काटेकोर पालन करण्याच्या सूचना सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांना सर्व विभागीय आयुक्त व जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांनी आपले स्तरावरुन द्याव्यात.

**अ)** विभागातील जमेच्या नोंदी कोषागारातील आणि लेखापरिक्षा कार्यालयातील नोंदीशी मेळ जमविण्याच्या असाव्यात, त्यासाठी जमा रकमांचा कोषागार कार्यालयाशी नियमित ताळमेळ घालण्यात

यावा व जमा रकमांचा कोषागार कार्यालयाशी ताळमेळ घेतल्याचे प्रमाणपत्र विभागीय आयुक्त कार्यालयामार्फत दरमहा शासनास न चुकता सादर करण्यात यावे.

**ब)** महसूल वसुलीच्या अचूक आकडेवारीसाठी "००२९-जमीन महसूल" आणि "०८५३-गौण खनिज उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या रकमा"या लेखाशीर्षांच्या योजना सांकेतांकानुसारच महसूलाची रक्कम शासनजमा करण्यात यावी.सदर योजना सांकेतांकाव्यतिरिक्त इतर योजना सांकेतांकानुसार शासनजमा करण्यात येणा-या महसूलाची आकडेवारी उक्त लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

**क)** क्षेत्रीय कार्यालयाकडून वसूल करण्यात येणा-या महसूल वसुलीच्या रकमा "ग्रास (GRAS)" प्रणालीद्वारेच शासनजमा करण्यात याव्यात. अन्य कोणत्याही मार्गाने सदरच्या रकमा शासनजमा करण्यात येणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१३१४४७२८८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Veer

Digitally signed by Madhav Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22eda eda6d9d0b7d64088adc780cd25e6, cn=Madhav Veer
Date: 2018.08.13 14:57:28 +05'30'

**( डॉ.माधव वीर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे

**प्रत :-** सर्व जिल्हाधिकारी यांना माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित.

**प्रतिलिपी :-**

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७) अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८) अ.मु.स.(महसूल,मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
९) मा.महालेखापाल १ / २ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१०) मा.महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
११) कार्यासन "ब-१", "ख" महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२) निवडनस्ती, "टी" कार्यासन.